पुणे जिल्ह्यातील दौंड तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२०/प्र.क्र.७७/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २६ ऑक्टोबर, २०२०.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र.मुअ(पुणे)/ का-२/रेशा/२१/८६८/२०२०, दि.२७/०२/२०२०.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र.मुअ(पुणे)/ का-२/रेशा/३६/३१८६/२०२०, दि.२१/०८/२०२०.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये पुणे जिल्ह्यातील दौंड तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, पुणे यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेऊन पुणे जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रजिमा ८१ पासून लोणारवाडी शिंगाडेवाडी बोरीबेल स्टेशन रा.मा.१३३ मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १७४ | (०/०० ते १२/००) १२.०० कि.मी. | १२.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१७६ |
| २. | कुसेगाव रोटी पांढरेवाडी कुरकुंभ ते प्रजिमा ६७ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १७१ | (०/०० ते ११/५००) ११.५०० कि.मी. | १४.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१७७ |
| | | ग्रामीण मार्ग ८० | (०/०० ते ३/००) ३.०० कि.मी. | | |
| ३. | रा.म.क्र. ६५ खडकी लोणारवाडी ते प्रजिमा ८१ ते हिंगणीबेंर्डी प्रजिमा ८० ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १७५ | (०/०० ते १५/००) १५.०० कि.मी. | १५.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१७८ |
| ४. | रा.म.क्र. ६५ यवत पिंपळगाव रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १६२ | (०/०० ते ११/२९) ११.२९ कि.मी. | ११.२९ कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१७९ |
| ५. | प्रजिमा ११९ पासून कोरेगाव भिवर मिसाळवाडी राहू रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १६१ | (०/०० ते १०/००) १०.०० कि.मी. | १०.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१८० |
| ६. | रा.म.क्र. ६५ फरगडेवस्ती माळवाडी कुसेगाव हिंगणीगाडा वासुंदे ते रा.मा.१२३ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १६७ | (०/००ते १२/४४) १२.४४ कि.मी. | १२.४४ कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१८१ |
| ७. | प्रजिमा ८१ पासून चिंचोली राजेगाव नायगाव रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १७३ | (०/००ते १४/२००) १४.२०० कि.मी. | १४.२०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१८२ |
| ८. | प्रजिमा ९० पडवी माळवाडी पाटस ते रा.म.६५ पर्यंतचा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १७२ | (०/०० ते १०/००) १०.०० कि.मी. | १०.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१८३ |
| ९. | पाटस बिरोबावाडी गार नानविज रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १७७ | (०/०० ते ८/००) ८.०० कि.मी. | १३.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१८४ |
| | | ग्रामीण मार्ग ९२ | (०/००ते ५/००) ५.०० कि.मी. | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १०. | नविन गार ते बेटवाडी धनगरवस्ती रा.म.६५ ते रोटी रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १६६ | (०/०० ते १८/००) १८.०० कि.मी. | १८.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१८५ |
| ११. | दौंड लिंगाळी ते रा.मा.९ पर्यंतचा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १६३ | (०/०० ते ११/२००) ११.२०० कि.मी. | ११.२०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१८६ |
| १२. | मेमाणवाडी पाटेठाण टाकळी लेंडेवाडी पानवली रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १६९ | (०/०० ते ८/००) ८.०० कि.मी. | १५.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१८७ |
| | | इतर जिल्हा मार्ग १७६ | (०/०० ते ७/५००) ७.५०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **१५७.१३ कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील पुणे जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१५७.१३ कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (४४५२.९+ १५७.१३) म्हणजेच **४६१०.८३ कि.मी.** इतकी व इतर जिल्हा मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **१४९.१३ कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (२१३८.८६-१४९.१३) म्हणजेच **१९८९.७३ कि.मी.** इतकी तसेच ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **८.०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१०००९.९६-८.००) म्हणजेच १०००१.१९६ **कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२०१०२६१३०३१७९४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.10.26 13:08:35 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन

जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी, पुणे .

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व) विभाग, पुणे.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.